**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत प्रशासकीय मंजुरी देण्यात आलेल्या जालना जिल्ह्यातील १७६ गांवे प्रादेशिक ग्रीड नळ पाणी पुरवठा योजनेस दुस-या हप्त्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः** मुपेयो-२०१७/प्र.क्र.१६०/पा.पु.१९
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
दिनांक:- ८ सप्टेंबर, २०१७

वाचा :

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक: पापुयो-२५१६/प्र.क्र.२६/पापु-१९, दिनांक २८.०९.२०१६
३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक: मुपेयो-२०१६/प्र.क्र.८६/पापु-१९, दिनांक ११.०१.२०१७
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३ दिनांक १८.०४.२०१७
५) संचालक ( वित्त ), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांचे क्र. मजीप्रा/वित्त-२/निधी/४१६, दिनांक २८.०८.२०१७ चे पत्र.

**प्रस्तावना -**

मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत जालना जिल्ह्यातील १७६ गांवे प्रादेशिक ग्रीड नळ पाणी पुरवठा योजनेच्या रुपये २३४.४१ कोटी इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. तसेच सदर योजनेच्या अंमलबजावणी करिता पहिल्या हप्त्याव्दारे रु. ७०३२.३८ लाख इतका निधी संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला आहे. वितरीत करण्यात आलेला निधी पूर्णत: खर्ची पडलेला असल्याने दुस-या हप्त्याचे अनुदान वितरीत करण्याची विनंती संचालक ( वित्त ), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी संदर्भ क्र. ४ च्या पत्रान्वये केली आहे. त्यास अनुसरुन उक्त निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**निर्णय :-**

**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत जालना जिल्ह्यातील १७६ गांवे प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून या योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणा मार्फत करण्यात येत आहे. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी पहिल्या हप्त्याव्दारे वितरीत करण्यात आलेला निधी पूर्णत: खर्ची पडलेला असल्याने दुस-या हप्त्या करिता रुपये ७०३२.३८ लाख इतका निधी ( अक्षरी रुपये सत्तर कोटी बत्तीस लाख अडतीस हजार फक्त ) इतका निधी संचालक ( वित्त ), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्दारे** ( BEAMS) **खालील अटींच्या अधीन राहून मंजूर व वितरीत करण्यात येत आहे.**

अटी :-

१) संचालक ( वित्त ), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी हे अनुदान वितरीत करतांना ते या योजनेलाच वितरीत होईल याची दक्षता घ्यावी. अन्य योजनांसाठी सदर निधी खर्च करु नये.

२) सदर निधी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातच खर्च होणे आवश्यक आहे. तो व्यपगत होणार नाही अथवा कोषागारातून आहरित करुन बँक खात्यात काढून ठेवला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वितरीत करण्यात आलेला निधी स्वीय प्रपंजी (PLA) किंवा अशा अन्य खात्या मध्ये ठेवण्यात येऊ नये.

४) मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत निधी मागणी करतांना चालू आर्थिक वर्षात वितरित करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादी बाबतची माहिती सादर केल्याशिवाय भविष्यात निधी मंजूर केला जाणार नाही.

५) ज्या प्रयोजनासाठी निधी वितरित करण्यात आलेला आहे, त्याबाबतची भौतिक प्रगतीची माहिती संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांच्या कडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दर तीन महिन्यानी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे विहित प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता नियंत्रक अधिका-याने घ्यावी.

६) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. या शासन निर्णयातील व दिनांक ७ मे, २०१६ च्या शासन निर्णयातील अटी व शर्तीची व NRDWP या योजनेंतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करुन घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र- १/२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा परिक्षणाकरीता महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून महाराष्ट्र जीवन प्राधिकरण संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

६) अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी कार्यासन पापु-१९ / पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई / नागपूर व पापु-१९ कार्यासनास सादर करावे.

७) उपरोक्त निधी संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र. ७५/अर्थ-३, दि. १८/०४/२०१७ मधील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच उक्त परिपत्रकान्वये आवश्यक असलेली प्रमाणपत्रे या विभागास सादर करण्यात यावीत.

८) याबाबतचा खर्च “मागणी क्र. वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(२६) मुख्यमंत्री

ग्रामीण पेयजल कार्यक्रम (२२१५ ९९४२)- ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखालील तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी रुपये ७०३२.३८ लाख (अक्षरी रुपये सत्तर कोटी बत्तीस लाख अडतीस हजार फक्त ) बाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक (वित्त), (श्री. सुधाकर डांगे) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (श्री. का. जा.धलपे ) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. संचालक, (वित्त)( श्री. सुधाकर डांगे) यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे तसेच अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (श्री. का. जा. धलपे) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरहू रक्कम एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या खाती जमा करण्यात यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक दि. १८/०४/२०१७ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर प्रकरणी वित्त विभाग परिपत्रक दिनांक १८/०४/२०१७ मधील अनुक्रमांक ७ ते १८ येथील अटींची तसेच त्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील क्र. ८ मधील अनुक्रमांक १ ते व १० येथील आवश्यक त्या बाबींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०१७०९०७१३४७२३७४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

K. J. Dhalape

Digitally signed by K. J. Dhalape
DN: CN = K. J. Dhalape, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply And Sanitation Department
Date: 2017.09.08 16:51:20 +05'30'

**( का.जा. धलपे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
६) जिल्हाधिकारी, जालना
७) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना.
९) महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
१०) महालेखापाल, ( लेखा परीक्षा ), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर
११) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१२) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, जालना.
१३) कार्यासन पापु-०४, पापु-१८ व पापु-२० पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय
१४) निवड नस्ती पापु-१९